**सार्वजनिक बांधकाम विभागाकडील रु.१.५० कोटी रकमेपर्यंतच्या कंत्राटदार नोंदणीकरणास मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- बीडीजी-२०२०/प्र.क्र. ८३/इमा-२**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक ३१ .०८.२०२०

वाचा - सार्वजनिक बांधकाम विभाग,शासन निर्णय क्र.सीएटी-१०९६/ प्र.क्र.१७२/इमा-२ (संकीर्ण-२०१७/ प्र.क्र.९४/ इमारती-२), दि. १६. ८. २०१७

**प्रस्तावना:-**

संपूर्ण देशात कोविड-१९ मुळे उद्भवलेल्या परिस्थितीमुळे दि.२४.०३.२०२० पासून Lockdown जाहीर करण्यात आले आहे. त्या अनुषंगाने वित्त विभागाने दि. ४ मे, २०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये सर्व विभागांना पुढील आदेशापर्यंत कोणतेही बांधकाम हाती न घेण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत. त्याचप्रमाणे सन २०२०-२०२१ मधील अर्थसंकल्पीय निधीच्या फक्त ३३% निधी उपलब्ध होईल या सूत्राच्या अधीन राहून विभागाने नियोजन करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. या Lockdown मुळे वाहतूक, मजूर यांच्या उपलब्धतेवर विपरित परिणाम झाला असून अशा परिस्थितीत सर्व छोटे-मोठे कंत्राटदार, सुशिक्षित बेरोजगार अभियंता, मजूर सहकारी संस्था यांची कामे बंद पडली असल्याचे तसेच Work Done, Work in hand, Turnover Certificate व इतर आवश्यक कागदपत्रे नोंदणी करण्याकरीता उपलब्ध होत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. कोविड-१९ मुळे उद्भवलेली अपवादात्मक परिस्थिती विचारात घेऊन पात्र नोंदणकृत कंत्राटदारांना काही सवलती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

सार्वजनिक बांधकाम विभागाकडील रु. १.५० कोटी किंमतीपर्यंत नोंदणी असलेल्या ज्या कंत्राटदारांची नोंदणी माहे जानेवारी २०२० ते माहे डिसेंबर २०२० या कालावधीत संपुष्टात आली असेल अथवा येणार असेल, अशा सर्व नोंदणीकरणास सरसकट माहे डिसेंबर, २०२० अखेरपर्यंत एक विशेष बाब म्हणून मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८३११५२३२००८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SACHIN MANIKRAO CHIVATE

Digitally signed by SACHIN MANIKRAO CHIVATE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=643026ceca9d6dc21fa6c4525f6fd9fbdfc59a9a42af9ca3066f28a4b58ad630, cn=SACHIN MANIKRAO CHIVATE
Date: 2020.09.03 15:56:29 +05'30'

**(सचिन चिवटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री ( सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा. राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
६. महालेखापाल-१, मुंबई
७. महालेखापाल-२, नागपूर
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / नागपूर
९. प्रत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी-
१०. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग (विद्युतसह)
११. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
१२. संचालक, उपवने व उद्याने, मुंबई
१३. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम सविभाग ( विद्युत / यांत्रिकी)
१४. अधीक्षक अभियंता यांनी आपल्या अधिनस्त विभागातील कार्यालयांना सदर शासन निर्णयाची प्रत अग्रेषित करावी.
१५. मुख्य अभियंता, अधीक्षक अभियंता, पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई
१६. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती ( कार्यासन इमारती-२ )